**प्रशासकीय मान्यता**
कार्यालयीन इमारतीच्या सभोवती
संरक्षक भिंत बांधण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन,**
गृह विभाग,
**शासन निर्णय क्रमांक बीजीटी-१०११/प्रक्र-१४/इएक्ससी-४,**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १४ मार्च, २०११.

वाचा : आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्रमांक बीएलडी-१००७/ ३१९८८/८३/सहा, दिनांक २२.१२.२०१०.

**शासन निर्णय :**

राज्य उत्पादन शुल्क विभागाच्या अधिनस्त विभागीय उप आयुक्त राज्य उत्पादन शुल्क, कोल्हापूर विभाग व अधीक्षक, कोल्हापूर यांच्या कार्यालयाच्या इमारतीच्या जागेभोवती असलेले तारेचे कुंपण खराब अवस्थेत आहे. त्यामुळे कार्यालयीन इमारती भोवती पक्क्या विटांच्या संरक्षक भिंतीचे कुंपण घालण्याचा प्रस्ताव आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क कार्यालयाने सादर केला आहे. सदर कामाचे अंदाजपत्रक सन २०१०-११ च्या दरसूचीवर आधारीत आहे. अंदाजपत्रक, उप अभियंता, कोल्हापूर यांनी तयार केले असून सक्षम अधिकारी म्हणून कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, कोल्हापूर यांनी साक्षांकित केले आहे. सदर अंदाजपत्रकामध्ये संभाव्य भाववाढीची तरतूद करुन एकूण रुपये २४,५९,२७५/- (एकूण रुपये चौवीस लाख, एकोणसाठी हजार, दोनशे पंच्याहत्तर फक्त) इतक्या सुधारित रकमेच्या खर्चाच्या प्रस्तावास सार्वजनिक बांधकाम विभागाने सहमती दर्शविली आहे. त्यानुसार प्रस्तावास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

२. संरक्षक भिंतीचे इमारतीचे काम वास्तुशास्त्रज्ञ यांच्याकडून वास्तुमांडणी नकाशा व संरक्षक भिंतीचा नकाशा तयार करुन त्यास मंजूरी घेतल्यावरच सुरु करावे. संरक्षण भिंत इ. कामाचा छेद नकाशा मापे व वावासह अंदाजपत्रकासोबत जोडावा. जागा मालकी हक्काबाबतची सर्व कागदपत्रे अंदाजपत्रकासोबत जोडावीत. अंदाज पत्रकावर उपभोक्ता खात्याच्या सक्षम अधिका-यांची स्वाक्षरी घेण्यात यावी. संगणकीकरणासाठी ठेवलेली तरतूद वगळण्यात येत आहे.

३. हा शासन निर्णय वित्त विभाग क्रमांक विअप्र-१०.०८/प्रक्र-७०/२००८/विनियम, दिनांक १५ मे, २००९ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियमपुस्तिका १९७८, भाग पहिला, उप विभाग-५ मधील अनुक्रमांक-१ अन्वये "महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियमपुस्तिका" अंतर्गत परिच्छेद क्रमांक-१३४, अट

क्रमांक-१ नुसार प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या शक्तींचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे. वित्तिय मान्यतेबाबतचे आदेश स्वतंत्ररित्या निर्गमित करण्यात येतील.

सदरचा शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौ संदर्भ क्रमांक ३४/इमा-३, दिनांक २१.१.२०११ अन्वये सहमतीने व मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक संकेतांक २०११०३१५२१४६४९००१ हा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशान्वये व नावाने.

[प्र. मु. काकड]
कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन.

प्रति.

1. आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
2. महालेखापाल-१/२ (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, मुंबई / नागपूर.
3. संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
4. विभागीय उप आयुक्त, कोल्हापूर विभाग,कोल्हापूर.
5. अधीक्षक, राज्य उत्पादन शुल्क,कोल्हापूर.
6. जिल्हा कोषागार अधिकारी, कोल्हापूर.
7. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, कोल्हापूर, जिल्हा कोल्हापूर.
8. निवड नस्ती, राउशु-४, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.